वेगवेगळ्या योजना बंद झाल्यामुळे कमी करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना पर्यायी नोकरी उपलब्ध करण्याबाबत - कालमर्यादा वाढविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
निर्णय क्रमांक एईएम-१०८२/०/सीआर-१०३/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १२ डिसेंबर १९८३.

वाचा :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-१०८१/३६५८/७३/१६-अ, दिनांक १४ एप्रिल १९८२.

निर्णय :- या शासन निर्णयासोबतच्या जोडपत्रात नमूद केलेल्या योजनांतून वेळोवेळी कमी करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-१०८०/०/१०८/१६-अ, दिनांक १ एप्रिल १९८० मधील अटींची पूर्तता करीत असल्यास, पर्यायी नोकरीत सामावून घेण्याचा कालावधी दिनांक ३० जून १९८४ पर्यंत वाढविण्यास शासन मंजुरी देत आहे. ज्या जिल्ह्यामध्ये कमी करण्यात आलेले कर्मचारी उपलब्ध आहेत, त्याच जिल्ह्याकरिता हे आदेश लागू होतील.

२. हे आदेश वित्त विभागाच्या अनुमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २८३६/इएसपी-४, दिनांक १ नोव्हेंबर १९८३ अन्वये निर्गमित करण्यात आले आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्र. द. मराठे,
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (पत्राने),
प्रोथोनोटरी ॲण्ड सिनियर मास्टर, हायकोर्ट, मुंबई (पत्राने),
रजिस्ट्रार, हायकोर्ट (अपिलेट साईड), मुंबई (पत्राने),
प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई (पत्राने),
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
महालेखापाल, महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र २, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
जिल्हाधिकारी, भंडारा, सातारा, नांदेड, नागपूर, नाशिक, औरंगाबाद,
उद्योग संचालक, मुंबई, कृषि संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
इतर सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
वित्त विभाग,
सार्वजनिक बांधकाम विभाग.

कृ. मा. प.

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-१०८२/०/सीआर-१०३/१६-अ, दिनांक १२ डिसेंबर १९८३ चे जोडपत्र

| अ.क्र. | ज्या योजनेतून कमी करण्यात आलेल्यांना पर्यायी नोकरीत सामावून घ्यावयाचे आहे, त्या योजनेचे नाव | योजना मंजूर करण्यासंबंधीच्या आदेशाचा क्रमांक व दिनांक | ज्या जिल्ह्यासाठी योजनेचा कालावधी वाढविण्यात येत आहे त्या जिल्ह्यांची नावे |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | पुनर्वसन संचालनालय, चंद्रपूर मधून कमी करण्यात आलेले कर्मचारी | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-१०७३/केड, दिनांक ६ मार्च १९७३ | भंडारा, सातारा व नागपूर. |
| २ | जनगणनेच्या कामावरून कमी करण्यात आलेले कर्मचारी. (१९७१ ची जनगणना) | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-१०७३/केड, दिनांक ६ मार्च १९७३. | सातारा, नांदेड व औरंगाबाद. |
| ३ | कृषि विभागातून कमी करण्यात आलेले कर्मचारी. | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-१०७४/३०२४३/जे-२, दिनांक ४ ऑक्टोबर १९७४. | भंडारा, सातारा. |
| ४ | लघु उद्योग घटक गणना योजनेतील कर्मचारी. | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-१०७४/३०२४३/जे-२, दिनांक २१ डिसेंबर १९७४. | भंडारा, सातारा, नांदेड व नाशिक. |
| ५ | उद्योग संचालनालयाच्या अधिपत्याखालील औद्योगिक प्रशिक्षण केंद्रातून कमी करण्यात आलेले कर्मचारी. | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-१०७५/३०२४३/जे-२, दिनांक २ जानेवारी १९७५. | भंडारा व नांदेड |
| ६ | टंचाई कामावरून कमी करण्यात आलेले लिपिकवर्गीय व मस्टर कारकून, वगैरे कर्मचारी. | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईएम-१०७३/२४९१/जे-२, दिनांक ७ जानेवारी १९७४ | उस्मानाबाद, नाशिक, सातारा, नागपूर, बुलढाणा, पुणे, सांगली व नांदेड. |

एच-९१५(४०००-१२-८३)अ.